सन २०१७-१८ या आर्थिक वर्षासाठी सर्व शिक्षा अभियान कार्यक्रमासाठी निधी वितरीत करणेबाबत (केंद्र व राज्य हिस्सा).

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसएसए-२०१७/प्र.क्र.११०/एस.डी-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: २६ मे, २०१७

**वाचा -**

१) शालेय शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक पीआरई-२०००/(२७४०)/प्राशि-१, दि. १८/०१/२००२
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.३४/कोषा प्रशा-५, दि. २४/०७/२०१५
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थस-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि. १८/०४/२०१७
४) केंद्र शासन, मनुष्यबळ विकास मंत्रालय, नवी दिल्ली आदेश क्रमांक: ४-२/२०१७-EE.८ (I ते VI) दिनांक २५/०४/२०१७

**प्रस्तावना-**

सर्व शिक्षा अभियान योजनेसाठी केंद्र व राज्य शासनाच्या हिस्स्याचे प्रमाण (केंद्र : राज्य) ६०:४० असे आहे. केंद्र शासनाने दिनांक २५/०४/२०१७ च्या आदेशान्वये केंद्र शासनाच्या हिस्स्याचा ad hoc निधी (General + SC + ST) म्हणून रु.३०१,२८,४४,०००.०० इतका निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा केलेला आहे. सदर निधीच्या प्रमाणात राज्य हिस्सा (General + SC + ST) रु.२००,८५,६२,६६८.०० इतका येतो. केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला केंद्र हिस्स्याचा निधी (सर्व साधारण) रु.२२५,४२,१०,०००.०० व त्याप्रमाणात राज्य हिस्सा (सर्व साधारण) रु. १५०,२८,०६,६६७.०० असा एकूण रु.३७५,७०,१६,६६७.०० निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

केंद्र शासनाने सर्व शिक्षा अभियान योजनेकरिता उपलब्ध करुन दिलेला केंद्र हिस्स्याचा निधी (सर्व साधारण) रु. २२५,४२,१०,०००.०० (अक्षरी रुपये दोनशे पंचवीस कोटी बेचाळीस लक्ष दहा हजार फक्त) व त्याप्रमाणात राज्य हिस्सा (सर्व साधारण) रु.१५०,२८,०६,६६७.०० (अक्षरी रुपये एकशे पन्नास कोटी अठ्ठावीस लक्ष सहा हजार सहाशे सदुसष्ट फक्त) असा एकूण रु. ३७५,७०,१६,६६७.०० (अक्षरी रुपये तीनशे पंचाहत्तर कोटी सत्तर लाख सोळा हजार सहाशे सदुसष्ट फक्त) इतका निधी महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांच्याकडे सर्व शिक्षा अभियान कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी या आदेशान्वये वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०१७-१८ या चालू आर्थिक वर्षाकरिता "मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनातंर्गत योजना, ८००-इतर खर्च (००) (१३) सर्व शिक्षा अभियान (राज्य हिस्सा) (२२०२ ३०४७) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" रु.१५०,२८,०६,६६७.०० इतका निधी या लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

"मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनातंर्गत योजना, ८००-इतर खर्च (००) (१२) सर्व शिक्षा अभियान (केंद्र हिस्सा) (२२०२ ।०४९) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" रु. २२५,४२,१०,०००.०० इतका निधी या लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. वित्त विभागाच्या दि. २४/०७/२०१५ च्या शासन परिपत्रकानुसार खालील बाबी नमूद करण्यात येत आहेत.

- ३.१) वित्त विभागाच्या दि. १८/०४/२०१७ च्या शासन परिपत्रकान्वये निधी वितरणाचे अधिकार विभागास आहेत.
- ३.२) यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५% पेक्षा अधिक खर्च झाला आहे.
- ३.३) ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.
- ३.४) दि. २४/०७/२०१५ च्या आदेशातील इतर मुद्दे या आदेशास लागू नाहीत.
- ३.५) परिपत्रकातील "अ" व "ब" ची पूर्तता होत आहे.

४. सदर खर्च वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. १८/०४/२०१७ व दि. २४/०७/२०१५ च्या शासन परिपत्रकातील सूचनांनुसार करण्यात यावा. सदर निधी आहरीत करुन वितरीत करण्यासाठी कक्ष अधिकारी (रोख शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, यांना "आहरण व संवितरण अधिकारी" तर उप सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर आदेश वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. १८/०४/२०१७ च्या शासन परिपत्रकास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ७ ते १८ मधील अटींची तसेच परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील १, २, ३, ४, ५, ६, ७ व ८ मधील बाबी या आदेशासाठी लागू नाहीत. परिशिष्टातील मुद्दा क्र. ५ नुसार केंद्र शासनाचा निधी प्राप्त झाला असल्याचे अभिप्राय वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने अनौपचारिक संदर्भ क्र. २३२/अर्थोपाय, दि.१६/०५/२०१७ अन्वये दिलेले आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०५२६१२१११७०२२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suvarna S Kharat

Digitally signed by Suvarna S Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School And Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a98fe3e5a45c818668168cffd366aced9a44c59607f616a36d403a80e74d0df, cn=Suvarna S Kharat
Date: 2017.05.26 12:48:40 +05'30'

**( डॉ. सुवर्णा खरात )**

सहसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव
३) मा. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
५) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नीरोड, मुंबई
६) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
८) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई - ६३
९) सर्व वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग)
१०) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
११) वित्त विभाग, (व्यय-५ / अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई
१२) कक्ष अधिकारी, रोख शाखा/ अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग , मंत्रालय, मुंबई
१३) निवड नस्ती (एस.डी.१).